**बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थाने गट-अ श्रेणीतील अधिका-यांना वाटप करण्याबाबत.................**

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शानिवा-१५०५/प्र.क्र.३९७/०५/२३-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दि. **२७ सप्टेंबर, २००५.**

**वाचा :- शासन निर्णय, सा.प्र.वि.क्र.शानिवा-१५९९/प्र.क्र.६३३/९९, दि.१७ नोव्हेंबर, १९९९.**

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.शानिवा-१५९९/प्र.क्र.६३३/९९/२३-अ, दि.१७ नोव्हेंबर, १९९९ (प्रपत्र-अ) अन्वये गट 'अ' श्रेणीतील अधिका-यांना बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थान वाटप करण्यासंदर्भात मूळ वेतनावर आधारित सहा वेतनगट तयार करण्यात आले आहेत. पूर्वी असणा-या वेतन गटांचा पुनर्विचार करुन ५ व्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार त्यात अनुज्ञेयता निश्चित करण्यात आली आहे. सदरचे वेतनगट हे वर्ग-१ व त्यावरील वेतनश्रेणीच्या अधिका-यांसाठी विहित करण्यात आले असून त्यानुसार त्यांना अनुज्ञेय असणा-या निवासस्थानाचे प्रकार निश्चित करण्यात आले आहेत. सद्यस्थितीत अधिका-यांना निवासस्थानाचे वाटप करताना सदर अधिका-याची वेतनश्रेणी लक्षात न घेता अधिकारी अर्ज करताना घेत असलेल्या मूळ वेतनावर आधारीत दि.१७ नोव्हेंबर, १९९९ च्या आदेशात विहित केल्यानुसार निवासस्थानाची अनुज्ञेयता निश्चित करण्यात येते व त्यांचे नाव संबंधित निवासस्थान प्रकारच्या प्रतिक्षायादीमध्ये समाविष्ट करण्यात येते आणि उपलब्धतेनुसार त्यांना निवासस्थानाचे वाटप करण्यात येते.

सुधारित वेतनश्रेणी लागू केल्यामुळे व विविध स्तरावर विशेषत: वरिष्ठ पातळीवर अनेक पदांची निर्मिती केल्यामुळे शासकीय निवासस्थानांची टंचाई भासू लागली आहे. वेतनश्रेणी निरपेक्ष वेतनगटनिहाय प्रतिक्षायादी तयार करण्यात येत असल्यामुळे काही प्रकरणात कनिष्ठ वेतनश्रेणीच्या अधिका-यांना वरिष्ठ वेतनश्रेणीचे अधिकारी प्रतिक्षायादीवर असतानाही केवळ त्यांना सध्या मिळणारे वेतन संबंधित निवासस्थान प्रकाराला अनुसरुन असल्यामुळे वरिष्ठ वेतनश्रेणीच्या अधिका-यांअगोदर निवासस्थानाचे वाटप होते. परिणामत: प्रकार-५ व ६ या दोन्ही प्रकारच्या प्रतिक्षा यादया लक्षणीयरित्या मोठया झाल्या असून वरिष्ठ अधिका-यांना दोन वर्षे व त्याहून अधिक काळ निवासस्थानासाठी प्रतिक्षा करावी लागते. प्रकार-६ मधील अधिकारी डिसें. २००३ पासून तर प्रकार- ५ मधील अधिकारी एप्रिल २००४ पासून अनुज्ञेय निवासस्थानाच्या प्रतिक्षेत आहेत. प्रकार- १, २, ३ व ४ मधील अधिका-यांना प्रकार - ५ व ६ मधील अधिका-यांच्या तुलनेने कमी वेळात निवासस्थानाचे वाटप होते.

शासकीय निवासस्थानाचे वाटप मूळ वेतनानुसार करण्यात येत असल्यामुळे वेगवेगळया वेतनश्रेणीत वेतन घेणारे परंतु मूळ वेतन समान असणारे अधिकारी प्रचलित नियमानुसार एकाच वेतनगटात येतात. त्यामुळे अगोदर अर्ज केलेले बरेच कनिष्ठ अधिकारी प्रतिक्षा यादीत वरिष्ठ अधिका-यांना ज्येष्ठ ठरतात व त्यांना वरिष्ठ अधिका-यांच्या अगोदर निवासस्थान वाटप होते, असे निदर्शनास आले आहे. या परिस्थितीत सध्या असणा-या निवासस्थान प्रकारांच्या अनुज्ञेयतेबाबत पुनर्विलोकन करुन वेतनश्रेणीनिहाय गट आणि त्याला अनुज्ञेय निवासस्थान निश्चित केल्यास वर नमूद केल्यानुसार आढळून येणारी विसंगती राहणार नाही .

वरील परिस्थितीत शा.नि.क्र.शानिवा १५९९/प्र.क्र.६३३/९९/२३-अ, दि.१७.११.१९९९ चे अधिक्रमण करुन पुढीलप्रमाणे निवासस्थानाचा प्रकार, वेतनश्रेणीनिहाय गट आणि सदर गटास अनुज्ञेय असणारे निवासस्थान निश्चित करण्यात येत आहे :-

| निवास स्थानाचा प्रकार | वेतनश्रेणीनिहाय सुरु होणारा वेतनाचा किमान टप्पा | अनुज्ञेय निवासस्थान | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | नियमित | क्षेत्रफळ चौ.फूट | संक्रमण | क्षेत्रफळ चौ.फूट |
| एक | ८००० ते ९९९९ | १. वांद्रे 'अ' प्रकार,<br>२. सहजीवन 'अ' प्रकार, नायगाव,<br>३. शितल, वरळी,<br>४. चंदनबाला, मुलुंड,<br>५. हिरानंदानी, पवई | ४०५<br>४५०<br><br>४००<br>४०६ | १. सरस्वती, वरळी,<br>२. स्नेहा, वरळी,<br>३. कलानगर, वांद्रे | ३००<br>३००<br>३०० |
| दोन | १०००० ते ११९९९ | १. फोर्जेट मंजील, ताडदेव<br>२. दर्शना, वरळी<br>३. वांद्रे 'य' प्रकार, | ६२१<br>६००<br>६३८ ते ७३० | १. गगनमहल 'ब' वरळी | ३०० |
| तीन | १२००० ते १४२९९ | १. हाजीअली "अ"प्रकार<br>२. हाजीअली "ब" प्रकार<br>३. हाजीअली इ.क्र.६, ४. साकेत, वरळी<br>५. बॅण्डमेन्स क्वॉर्टर्स<br>६. कावेरी, वरळी<br>७. गोमती, वरळी<br>८. शरावती, वरळी<br>९. सागर, चर्चगेट<br>१०. तुषार, चर्चगेट | ८४८ ते १२२०<br>६३६ ते ७५७<br>६८०<br>६५०<br>७०० ते ८००<br>७००<br>७००<br>७००<br>६३०<br>६३० | १. पंतनगर इ.क्र.१८६, घाटकोपर | ३५० |
| चार | १४३०० ते १८३९९ | १. मंदार, चर्चगेट<br>२. केदार, चर्चगेट<br>३. आसावरी, चर्चगेट<br>४. विभावरी, चर्चगेट | ७५०<br>७५०<br>८३०<br>८३० | १. तुषार, चर्चगेट (एक खोली व स्वयंपाकघर असलेली निवासस्थाने)<br>२. विसावा, वरळी | ३६५<br>४०० |
| पाच | १८,४०० ते २२४०० | १. अंबर, मलबार हिल<br>२. अवंती, मलबार हिल<br>३.यशोधन, चर्चगेट (२ बेड)<br>४. निलांबरी, चर्चगेट<br>५. बेलहेवन, मरिनलाईन्स | १७५०<br>१७५०<br>१४७०<br>११६५<br>१३६१ | १. तुषार, चर्चगेट (दोन खोल्या व स्वयंपाकघर असलेली निवासस्थाने)<br>२. प्रवासी, वरळी | ४६०<br>४०० |
| सहा | २२४०० आणि त्यापेक्षा अधिक | १. यशोधन, चर्चगेट (३ बेड)<br>२. सुरुचि, चर्चगेट<br>३. सुनिती, चर्चगेट | १७५०<br>१६६५<br>१६६५ | १. तुषार चर्चगेट (दोन खोल्या व स्वयंपाकघर असलेली निवासस्थाने)<br>२. प्रवासी, वरळी | ४६०<br>४०० |

या शासन निर्णयांच्या दिनांकास प्रतिक्षा यादीवर असलेल्या अधिका-यांच्या प्रतिक्षा यादया वरील परिच्छेद-३ मध्ये दर्शविलेल्या वेतनश्रेणी निहाय सुधारित करण्यात याव्यात व या आदेशान्वये निश्चित केलेल्या सुधारित अनुज्ञेयतेनुसार निवासस्थानांचे वाटप करण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने.

**(रा.का.पवार)**
**सह सचिव , महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव,
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. उप मुख्यमंत्र्याचे सचिव,
४. मुख्यमंत्री/ उपमुख्यमंत्री/ सर्व मंत्री/ सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
* ५. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई (५ प्रती)
* ६. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (५ प्रती)
* ७. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
* ८. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
९. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. अधिक्षक अभियंता, मुंबई मंडळ, मुंबई,
११. मुख्य अभियंता, प्रादेशिक (सा.बां.) विभाग मुंबई, २५, मर्झबान पथ, मुंबई,
१२. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई,
१३. कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई , वरळी, मुंबई,
१४. कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विभाग, अंधेरी (प), मुंबई,
१५. सक्षम प्राधिकारी, बृहन्मुंबई, जुने जकात घर, मुंबई,
* १६. सचिव, लोकसेवा आयोग, मुंबई,
१७. अधिदान व लेखा कार्यालय,
* १८. बृहन्मुंबईतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
१९ . सर्व मंत्रालयीन विभाग,
२०. सामान्य प्रशासन विभागामधील सर्व कार्यासने,
२१. निवड नस्ती.

*** ( पत्राने)**

-----